अॅड. राजेंद्र मुगदिया यांना व्यावसायिक फी प्रदान करण्याबाबत....
उस्मानपुरा पोलीस स्टेशन गु.र.क्र.२२८/२०२० अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या न्यायालयीन कामकाजाकरीता.

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-एसपीपी-०३२१/प्र.क्र.६४/पोल-१०**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
२ रा मजला, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ५ मे,२०२२.

**संदर्भ:-** शासन अधिसूचना, विधि व न्याय विभाग, क्र.एसपीपी-२०२१/यू.ओ.आर.७८/डी-१४, दि. १०.१२.२०२१

**शासन निर्णय :-**

उस्मानपुरा पोलीस स्टेशन गु.र.क्र.२२८/२०२० अन्वये दाखल गुन्हयातून उद्भवलेल्या सत्र खटला क्र.२२८/२०२० या न्यायालयीन कामकाजामध्ये शासनाच्या वतीने कामकाज पाहण्यासाठी संदर्भान्वये विशेष सरकारी अभियोक्ता म्हणून मा. सत्र न्यायालय, औरंगाबाद येथे नियुक्त अॅड. राजेंद्र मुगदिया यांना खालील प्रमाणे व्यावसायिक फी अदा करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**प्रतिदिन परिणामकारक सुनावणी फी----- रू.१०,००० (रूपये दहा हजार फक्त)**

तसेच सदर फी व्यतिरिक्त अन्य कोणतेही लाभ अॅड. राजेंद्र मुगदिया यांना अनुज्ञेय होणार नाहीत. तसेच त्यांना कोणत्याही अपरिणामकारक सुनावणीकरीता व्यावसायिक फीचे प्रदान करण्यात येणार नाही.

२. परिणामकारक सुनावणीचे दिवस संबंधीत प्रकरणाच्या पर्यवेक्षीय पोलीस उपायुक्त दर्जाहून कमी नाही, अशा अधिकाऱ्याकडून तसेच संबंधित मा. न्यायालयाच्या प्रबंधकांकडून तपासून, प्रमाणित करुन घेण्यात यावेत व कोणत्याही प्रकारचे अतिरिक्त प्रदान होणार नाही, याची दक्षता संबंधित पोलीस उपायुक्त / पोलीस अधिक्षक यांनी घ्यावी.

३. यासाठी येणारा खर्च या विभागाच्या " मागणी क्र. बी-१, २०५५ पोलीस - (००) (१०९), जिल्हा पोलीस (००) (०१) जिल्हा पोलीस दल - (२०५५ ०१६८) - २८-व्यावसायिक व विशेष सेवा" या लेखाशीर्षाखालील त्या-त्या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदीच्या उपलब्धतेच्या अधीन आणि मंजूर अनुदानातून व मासिक निधी विवरणपत्रानुसार भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौ. सं. क्र. ४७७/२०२१/व्यय-७, दि.१२.०७.२०२१ अन्वये प्राप्त शासन मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक संकेतांक क्र. २०२२०५०५१६३०५८४९२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Tushar Dilip Rathod

Digitally signed by Tushar Dilip Rathod
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e7e9706be693397ead11bd0e0b8fbaec45488529c8b57466dbf3e7c095089c08, pseudonym=E5959DAF1A16023D678D1801FC611F35E4BD6SFF, serialNumber=B88BABB31CB2C1163B5A1E41E86D809272FEA91481473460 0D0B42642848C06F, cn=Tushar Dilip Rathod
Date: 2022.05.05 16:31:42 +05'30'

**(तुषार दि. राठोड)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२) विशेष पोलीस महानिरिक्षक, औरंगाबाद परिक्षेत्र, औरंगाबाद.
३) पोलीस अधिक्षक, औरंगाबाद.
४) वरिष्ठ पोलीस निरिक्षक, उस्मानपुरा पोलीस ठाणे, औरंगाबाद
५) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परीक्षा), मुंबई, महाराष्ट्र राज्य.
६) जिल्हा कोषागार अधिकारी, औरंगाबाद.
७) जिल्हा लेखा परिक्षा अधिकारी, औरंगाबाद
८) ॲड. राजेंद्र मुगदिया, ३ परदेशी टॉवर, दर्गा रोड, शाहनुरवाडी, औरंगाबाद - ०५.
९) कार्यासन अधिकारी (का-१४)/अ' शाखा, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन अधिकारी (व्यय-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११) निवडनस्ती (पोल-१०)